जिल्हा परिषदांना अनुदान सुलभतेने उपलब्ध होण्यासाठी विहित करावयाची कार्यपध्दती.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
परिपत्रक क्र. भानिम-२०१०/प्र.क्र.८५/वित्त-८
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ जून, २०१०

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. कोषाका-१००८/प्र.क्र.८७/कोषा प्रशा ५, दि. १५ ऑक्टोंबर, २००८

२) भारताचे नियंत्रक व महालेखा परिक्षक यांचा दि.३१ मार्च, २००७ रोजी संपलेल्या वर्षाचा स्थानिक संस्था अहवाल.

**प्रस्तावना:-** प्रशासकीय विभागाने किंवा त्यांचे अधिनस्त नियंत्रण अधिका-याने लेखाशीर्षनिहाय, योजनानिहाय प्रत्येक महिन्यासाठी मंजूर मासिक कॅश फ्लो च्या तरतूदीच्या अधिन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (Through BEAMS) तरतूद जिल्हा परिषदांना सुपूर्द करावी तसेच अशा तरतुदी वितरीत करण्यापूर्वी योजनासंबंधी सर्व अटी शर्ती निश्चित करुन ते जिल्हा परिषदांना कळविण्यात आले आहे याची दक्षता घेण्यात यावी अशा सूचना संदर्भिय शासन निर्णयाद्वारे देण्यात आल्या आहेत. तसेच सहाय्यक अनुदानासाठी उपलब्ध करण्यात आलेली अर्थसंकल्पीय तरतूद व्यपगत होऊ नये म्हणून प्रशासकीय विभागास / नियंत्रण अधिका-यास / जिल्हा परिषदेस मासिक निधी विवरणपत्र बदलण्याचे अधिकारही देण्यात आले आहेत. तरीही अजूनही अनेक अनुदान वितरण अधिकारी, अनुदान वितरणाचे आदेश ३१ मार्च पूर्वी जिल्हा परिषदांना पोहोचतील अशा पध्दतीने कार्यवाही करीत नाहीत किंवा आदेशाच्या प्रती वेळीच पोहचल्या व त्यानुषंगाने अनुदान कोषागारातून आहरीत केले आहे अगर कसे, याची खातरजमा करुन घेत नाहीत, परीणामी वित्तीय वर्षातील मंजूर अनुदान प्रशासकीय विभागाकडून / अनुदान वितरण अधिका-यांकडुन अनुदानाचे आदेश (शाईच्या सहीसह) वेळीच प्राप्त न झाल्यामुळे कोषागारातून आहरीत न झाल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे विकास योजनांच्या खर्चावर परिणाम होतो व लोकलेखा समितीत याबाबत विचारणा होते.

भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या सन २००६-०७ च्या स्थानिक संस्था अहवालात असा आक्षेप घेण्यात आला आहे की, **सन २००४-०५ ते २००६-०७ या कालावधीत आर्थिक वर्ष बंद होण्यापूर्वी प्रशासकीय विभागांकडून वाटप आदेश प्राप्त न झाल्याने रु.१४२.१३ कोटी निधीचे आहरण झाले नाही. भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांनी दि. ४ मार्च, २०१० च्या पत्रान्वये ही बाब मा. मुख्यमंत्र्यांच्या निदर्शनास आणली आहे.** त्यानुषंगाने सर्व संबंधित प्रशासकीय विभाग व त्या विभागाच्या अधिपत्याखालील संबंधित नियंत्रण अधिकारी यांना पुढीलप्रमाणे पुन्हा सूचना देण्यात येत आहेत.

कृ.मा.प.

**परिपत्रक :-**

प्रशासकीय विभागाने किंवा त्यांच्या अधिनस्त नियंत्रण अधिका-यानी लेखाशीर्षनिहाय, योजनानिहाय प्रत्येक महिन्यासाठी मंजूर कॅश फ्लोच्या तरतुदीच्या अधिन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (Through BEAMS) तरतूद जिल्हा परिषदांना सुपूर्द करावी. जिल्हा परिषदांना अनुदान वितरणाचे शाईच्या सहीचे आदेश वेळच्यावेळी पाठवावेत तसेच वर्षअखेरीचे सुधारित अनुदानाच्या वितरणाचे आदेश दि.३१. मार्च पूर्वी जिल्हा परिषदेला पोहचतील व त्याचे आहरण कोषागारातून १००% होईल याची खबरदारी घेण्यात यावी आणि नियंत्रण अधिका-याच्या सहाय्यक अनुदान वितरण आदेशानुसार जिल्हा परिषदेने अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे दि. ३१ मार्च पूर्वी कोषागारातून रक्कम आहरित करावी. तसेच कोणत्याही परिस्थितीत अनुदान व्यपगत होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www maharashtra gov. in या वेबसाईटवर ठेवण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्र.२०१००६२९१९२६१२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सुधीर ठाकरे)
सचिव (ग्राम विकास व पंचायत राज)

प्रति,

१. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, शालेय शिक्षण विभाग / उच्च माध्यमिक शालेय विभाग / सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण विभाग / पाणी पुरवठा स्वच्छता विभाग / सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग / महिला व बाल कल्याण विभाग / वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग / कृषी, पशुसंवर्धन दुग्ध व मत्स्य व्यवसाय विभाग / सार्वजनिक बांधकाम विभाग / नियोजन विभाग

२. उपसचिव (अर्थसंकल्प), ग्राम विकास व जलसंधारण विभाग (खुद्द), वित्त-१ / जल-४ / योजना-६

३. विभागीय आयुक्त सर्व.

४. कृषी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे

५. पशुसंवर्धन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे

६. संचालक, आयुर्वेद, खन्ना कन्स्ट्रक्शन हाऊस, डॉ.थडाणी मार्ग, ४ था मजला, वरळी, मुंबई - ४०० ०१८.

७. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८. उच्च शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

९. संचालक, आरोग्य सेवा महाराष्ट्र राज्य पुणे

१०. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण, माता बाल संगोपन व शालेय आरोग्य, महाराष्ट्र राज्य, पुणे.

११. सह संचालक, आरोग्य सेवा (आरोग्य), महाराष्ट्र राज्य, पुणे

१२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास कार्यक्रम, कोकण भवन, नवी मुंबई.

१३. संचालक, महिला व बाल विकास संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

१४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक

१५. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पीएमटी बिल्डींग, स्वारगेट, पुणे-३७.

१६. सहाय्यक संचालक, आयुर्वेद, नागपूर.

--------